पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित
अर्थसंकल्पीय तरतूद सन २०२१-२२
मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने
भारित (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील
व्याज (अनिवार्य) ४५, व्याज (२०४९ १२६८)

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.१९०/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २४ फेब्रुवारी, २०२२

**वाचा :-**

१. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि-२०२१/प्र.क्र.४/सेवा-६, दि. ३.५.२०२१
२. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि-२०२१/प्र.क्र.७/सेवा-६, दि. २०.७.२०२१
३. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि-२०२१/प्र.क्र.१०/सेवा-६, दि. २१.१०.२०२१
४. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि-२०२१/प्र.क्र.५/सेवा-६, दि. ३०.१२.२०२१
५. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.३.२.२०२२
६. महालेखाकार कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः एम.एच.८३३६/२९२, दि.४.२.२०२२

**प्रस्तावना :-**

सन १९८२-८३ पासून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे कार्यरत असलेल्या सर्व कर्मचारी / अधिकारी यांच्या भविष्य निर्वाह निधी पोटी प्राधिकरणाकडून प्राप्त होणारी वर्गणीची रक्कम / सांविधीक ठेव म्हणून लेखाशिर्ष-८३३६ नागरी ठेवी अंतर्गत शासनाकडे जमा करण्यात येते. शासनाकडे मार्च अखेर एकूण जमा असलेल्या रकमेवर भविष्य निर्वाह निधीच्या व्याज दराने प्रचलित पद्धतीने लेखाशिर्ष २०४९१२६८ अंतर्गत प्राधिकरणास व्याज देण्यात येते.

२. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या ठेवीपोटी शासनाकडे दि.३१.३.२०२१ अखेर रु.३२१,६२,०३,४९६/- इतकी रक्कम जमा असल्याचे महालेखाकार कार्यालयाने दिनांक ४.२.२०२२ च्या पत्रान्वये कळविले आहे. सदर रकमेवर भविष्य निर्वाह निधीच्या प्रचलित व्याज दराने व्याजाची रक्कम पुस्तकी समायोजनाद्वारे प्राधिकरणाला वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :-

आर्थिक वर्ष सन २०२१-२२ मध्ये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाचा खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक " वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचारी यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (अनिवार्य) ४५, व्याज (२०४९१२६८) " या लेखाशिर्षाखाली प्राधिकरणाला २२,८३,५०,४४८/- (अक्षरी रुपये बावीस कोटी त्र्याऐंशी लाख पन्नास हजार चारशे अठ्ठेचाळीस फक्त) इतकी व्याजाची रक्कम या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून होणारा खर्च हा पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित करावयाचा असून हा खर्च महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज प्रदान करण्यासाठी मागणी क्रमांक " वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचा-यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (अनिवार्य) ४५, व्याज (२०४९ १२६८) " या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखवून तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी हा "८३३६-नागरी ठेवी, ८००-इतर ठेवी, (००) (०८) महाराष्ट्र पाणी पुरवठा व मलनि:सारण मंडळाच्या कर्मचा-यांचा भविष्य निर्वाह निधी " या शिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने जमा करण्यात यावा.

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२१ / प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक ३.२.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात तसेच उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२४११५१५६६९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB
BABASAHEB
HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, pseudonym=ECB735300543A776F1DE714D85AF521F7953EAF5, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2022.02.24 12:36:43 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व
२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
३. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१०.कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थसंकल्प-१८)
११.कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१२.निवड नस्ती कार्यासन पापु-२३